निधी वितरण-शासन घोषित पीकनिहाय किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारीत दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक: पुरक १५१८/प्र.क्र.२२६/१अे
मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०००३२.
दिनांक:- १९ मार्च, २०२०.

वाचा:-

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २७१७/ प्र.क्र.१९९/१अे, दिनांक १७.९.२०१८.
२. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृआ/ गुनि/१/२ एम.एस.पी./५३७/२०१८, दिनांक १३.१२.२०१८ चे पत्र.
३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दिनांक ११.१.२०१९.
४. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृआ/ गुनि/१/२ एम.एस.पी./९६/२०१९ दिनांक १२.३.२०१९ रोजीचे पत्र.
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दिनांक १९.०३.२०१९.
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक :- पुनर्वि-२०१८/ प्र.क्र.११२ (६)/१८/२अे, दिनांक ३०.०३.२०१९.
७. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.:- पुरक १५१८/ प्र.क्र२२६/१अे, दि.३०.०३.२०१९.
८. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृ.आ. गुनि/१/२/एमएसपी/७७८/२०१९ दिनांक २३.०८.२०१९ रोजीचे पत्र
९. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृ.आ/एमएसपी/२/१/गुनि/११७३/२०१९ दिनांक ३०.०८.२०१९ रोजीचे पत्र.
१०. कृषि आयुक्तालयाचे क्रमांक :- जा.क्र.कृ.आ. गुनि/१/२/एमएसपी/५९५०/२०२० दिनांक १२.०२.२०२० रोजीचे पत्र

प्रस्तावना:-

राज्यातील बिजोत्पादन कार्यक्रमात स्थिरता येण्याच्या दृष्टीने तसेच, शेतकऱ्यांचा बिजोत्पादन कार्यक्रमातील सहभाग कायम राखण्याच्या दृष्टीने दिनांक १७ सप्टेंबर,२०१८ च्या शासन निर्णयानुसार शासन घोषित किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारीत दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला आणि राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबतची नवीन योजना लागू करण्यात आलेली आहे. खरीप व रब्बी हंगाम २०१७-१८ मध्ये

उत्पादित झालेल्या बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बियाणांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारित दर व शासन घोषित किमान आधारभूत किंमत (MSP) यामधील फरकाची रक्कम रुपये ३१००.२३ लाख निधी उपलब्ध करून देण्याबाबतचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाकडून प्राप्त झालेला होता. यास अनुसरून शासन निर्णय दिनांक ११.१.२०१९ च्या निर्णयान्वये रूपये २१.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला होता. उर्वरित निधी वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने दिनांक १२.३.२०१९ च्या पत्रान्वये केलेली होती. यास अनुसरून शासन निर्णय दिनांक १९.०३.२०१९ च्या निर्णयान्वये रूपये ३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला होता. तसेच, सदर योजनेकरीता रु. ५.६८ कोटी इतका निधी पुर्नविनियोजनाने उपलब्ध करून देण्यात येऊन दि ३०.०३.२०१९.रोजीच्या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेला आहे. सदरची फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज) अकोला यांना उपलब्ध करुन देण्यात आलेली होती. राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्यासाठी निधी उपलब्ध नसल्याने वितरीत करण्यात आलेला नव्हता.

राज्यातील बिजोत्पादक शेतकऱ्यांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर व शासन घोषित किमान आधारभुत किंमत (MSP) यामधील फरक अदा करणेकरिता राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या प्रस्तावानुसार, वाचा क्र. ०९ येथील पत्रान्वये कृषि आयुक्तालय, पुणे यांनी रु १०१.०१ .लाख इतका निधी वितरीत करणेबाबत विनंती कलेली आहे. यास अनुसरून खरीप व रब्बी हंगाम २०१७-१८ मध्ये उत्पादित झालेल्या बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बियाणांच्या फरकाची रक्कम रु.१०१.०१ लाख इतका निधी राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सदर योजनेस संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील प्रशासकीय मान्यतेनुसार खरीप व रब्बी हंगाम २०१७-१८ मध्ये उत्पादित झालेल्या बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बियाणांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर आणि शासन घोषित किमान आधारभुत किंमत यामधील फरकाची रक्कम राष्ट्रीय बीज निगम, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्यासाठी लेखाशिर्ष २४०१ A९२२ (१००% राज्य योजना) अंतर्गत रू. १०१.०१ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी P.L.A./बँक खात्यांमध्ये ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -डी २४०१, पिक संवर्धन, १०३, बी-बियाणे,
(००) (२८) किमान आधारभुत किंमत (MSP) आणि कृषि उत्पन्न बाजार समिती आधारभूत दर यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत
(१०० टक्के राज्य कार्यक्रम) ३३- अर्थसहाय्य (२४०१ A९२२)

२. सदर फरकाची रक्कम थेट लाभ हस्तांतरणाद्वारे बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या आधारलिंक बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

३. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ ३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थस -२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ ३, दिनांक ०८जुलै, २०१९ आणि वित्त विभाग- परिपत्रक क्रमांक अर्थस ,२०१९.क्र.प्र /९२३ अर्थ/, दिनांक २०२० जानेवारी २२ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

४. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्र.२३३/१४३१, दिनांक २८.१२.२०१९ व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.२/२०२०/व्यय-१ दिनांक ०९.०१.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१९१७०५५७२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.03.19 17:09:28 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
६.विभागीय व्यवस्थापक, राष्ट्रीय बीज निगम, गुलटेकडी, पुणे.
७.संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८.महाव्यवस्थापक (उत्पादन), महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला.
९.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सर्व संचालक/सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.सर्व विभागीय कृषि सह संचालक.
१२.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१५.वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय,मुंबई.
१६.निवडनस्ती, कार्यासन १अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.